अर्थसंकल्पिय अनुदान सन २०२४-२५
"२२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१) (०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (अनिवार्य) ( २२१५१८४३)"
मागणी क्रमांक वाय -२

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-११२५/प्र.क्र.२७/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
दिनांक : २७ मार्च, २०२५

**वाचा :-**

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२४/प्र.क्र.९९/पापु-२३, दि. २२ एप्रिल, २०२४
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२४/प्र.क्र.९९/पापु-२३, दि. २९ मे, २०२४
३. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२४/प्र.क्र.९९/पापु-२३, दि. २१ जून, २०२४
४. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२४/प्र.क्र.९९/पापु-२३, दि. ०२ ऑगस्ट, २०२४
५. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२४/प्र.क्र.९९/पापु-२३, दि. ०३ सप्टेंबर, २०२४
६. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२४/प्र.क्र.९९/पापु-२३, दि. ०८ ऑक्टोबर, २०२४
७. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२४/प्र.क्र.९९/पापु-२३, दि. १३ जानेवारी, २०२५.
८. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.०२ फेब्रुवारी, २०२५.
९. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वर्ग १ व वर्ग २ संवर्गातील अधिका-यांचे वेतनखर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या

अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)” या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष सन २०२४-२५ करिता ०१, वेतन साठी एकूण रुपये ५५.८९६३ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत केलेला होता. सदर अर्थसंकल्पीत निधी पैकी आवश्यक निधी संदर्भाधीन (२) ते (८) च्या शासन निर्णयान्वये संबंधित जिल्हा परिषदांना वेतनाकरीता वितरीत करण्यात आला आहे. तथापि जिल्हा परिषदांचा एकूण खर्च विचारात घेऊन उपरोक्त अर्थसंकल्पिय तरतूद पुरेशी नसल्यामुळे मार्च, २०२५ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनामध्ये रु.१०००/- इतक्या रकमेची लाक्षणिक पुरवणी मागणी सादर करण्यात आली असून सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत वित्त विभागाने रू.६५.२१६३ कोटी इतके सुधारित अंदाज मंजूर केले आहेत. सुधारित अंदाजाद्वारे अर्थसंकल्पित केलेला अतिरिक्त निधी राज्यातील जिल्हा परिषदांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८४३)” या लेखाशिर्षाखाली जिल्हा परिषद ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वर्ग १ व वर्ग २ च्या अधिका-यांचे वेतन खर्च भागविण्यासाठी या शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र अ” मध्ये दर्शविल्यानुसार एकूण रुपये ९,४८,००,०००/- (अक्षरी रुपये नऊ कोटी अठ्ठेचाळीस लाख फक्त ) इतका निधी संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना मंजूर करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. या शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र अ” मध्ये व वरील परिच्छेद २ मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी खर्च केल्यानंतर पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी. तसेच झालेल्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाशी वेळोवेळी ताळमेळ घ्यावा. ताळमेळाचे काम प्रलंबित असल्यास पुढील निधी वितरीत करण्यात येणार नाही. शासनाद्वारे देण्यात येणारे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक

अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

४. वितरीत केलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तींचे पालन करावे.

५. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ " २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१) (०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८४३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१५१/व्यय-३, दिनांक २१.०३.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१४४७३७७३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB B HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2025.03.27 16:31:50 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व
२. विभागीय आयुक्त, सर्व
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)

८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११.अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१२.कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१८)
१३.कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१४.निवड नस्ती कार्यासन पापु-२३

## विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक मजीप्रा११२५/प्र.क्र.२७/पापु-२३, दिनांक २७ मार्च, २०२५ सोबतचे सहपत्र

| मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१)आस्थापना (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय/उप विभागीय आस्थापना(अनिवार्य) (२२१५१८४३), ०१-वेतन" | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | जिल्हा परिषद | सन २०२४-२५ करीता या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेले वेतन अनुदान | या शासन निर्णयान्वये लेखाशीर्ष २२१५१८४३ खाली वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (अक्षरी रुपये) |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | पालघर | १५०००००० | रूपये पंधरा लाख फक्त |
| २ | रायगड | ३०००००० | रूपये तीस लाख फक्त |
| ३ | रत्नागिरी | ३०००००० | रूपये तीस लाख फक्त |
| ४ | सिंधुदुर्ग | १०००००००० | रूपये एक कोटी फक्त |
| ५ | नाशिक | ४०००००० | रूपये चाळीस लाख फक्त |
| ६ | नंदुरबार | १५०००००० | रूपये पंधरा लाख फक्त |
| ७ | अहमदनगर | ३५०००००० | रूपये पस्तीस लाख फक्त |
| ८ | पुणे | ४०००००० | रूपये चाळीस लाख फक्त |
| ९ | सांगली | १७०००००० | रूपये सतरा लाख फक्त |
| १० | सोलापूर | १०७०००००० | रूपये एक कोटी सात लाख फक्त |
| ११ | कोल्हापूर | २१०००००० | रूपये एकवीस लाख फक्त |
| १२ | छत्रपती संभाजीनगर | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| १३ | जालना | ९००००० | रूपये नऊ लाख फक्त |
| १४ | परभणी | ७००००० | रूपये सात लाख फक्त |
| १५ | हिंगोली | ४०००००० | रूपये चाळीस लाख फक्त |
| १६ | धाराशिव | ७००००० | रूपये सात लाख फक्त |
| १७ | लातूर | ४२०००००० | रूपये बेचाळीस लाख फक्त |
| १८ | बीड | १०००००००० | रूपये एक कोटी फक्त |
| १९ | नांदेड | १७०००००० | रूपये सतरा लाख फक्त |

| | | | |
|---|---|---|---|
| २० | बुलढाणा | २९००००० | रूपये एकोणतीस लाख फक्त |
| २१ | अकोला | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| २२ | अमरावती | ४८००००० | रूपये अठ्ठेचाळीस लाख फक्त |
| २३ | यवतमाळ | १९००००० | रूपये एकोणीस लाख फक्त |
| २४ | नागपूर | ५०००००० | रूपये पन्नास लाख फक्त |
| २५ | भंडारा | ४०००००० | रूपये चाळीस लाख फक्त |
| २६ | गोंदिया | १४००००० | रूपये चौदा लाख फक्त |
| २७ | चंद्रपूर | ४४००००० | रूपये चव्वेचाळीस लाख फक्त |
| २८ | गडचिरोली | १२००००० | रूपये बारा लाख फक्त |
| एकूण | | ९४८०००००० | रूपये नऊ कोटी अठ्ठेचाळीस लाख फक्त |

BALASAHEB B HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2025.03.27 16:32:52 +05'30'

( बाळासाहेब बा. हजारे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन